कोकण रिव्हेरा सर्कीट
राज्याचा हिस्सा.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००३/७/प्र.क्र.३३६/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ०६ मार्च, २००४.

**वाचा:-** १) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र क्र.मपविम/लेखा/२००३, दिनांक १२ जानेवारी २००४.

**शासन निर्णय:-** वित्त विभागाच्या शासन निर्णय, दिनांक ११.७.२००१ (Delegation of Powers) सोबत जोडलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ अ.क्र.४ परिच्छेद २७(२)(अ) मधील भाग-१, उपविभाग-३ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांनी प्रस्तावित केलेल्या कोकण रिव्हेरा सर्कीटमधील सिंधुदुर्ग, विजयदुर्ग व जयगड या ठिकाणांचा पर्यटनदृष्टया विकास कामासाठी लागणा-या रु. ५,१४,२०,३८८/- या अंदाजपत्रकीय रकमेपैकी जयगड येथील जयगड किल्ल्याजवळ रेस्टॉरंट बांधण्यासाठी सध्या जागा उपलब्ध नसल्याने त्यासाठी येणा-या रु. ३६,००,०००/- ची अंदाजपत्रकीय रक्कम वगळून उर्वरीत कामांसाठी येणा-या रु. ४७८.२० लाखाच्या अंदाजपत्रकीय रकमेस व कामांस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**सिंधुदुर्ग:-**

| | | |
|---|---|---|
| १ | मालवण ते तारकली रस्त्याची दुरुस्ती | रु. ७२,८७,२३३/- |
| २ | नेरुरपार येथे ॲप्रोच रोड | रु. १०,२७,२५०/- |
| ३ | तारकर्ली येथे रेस्टॉरंटचे बांधकाम | रु. ३२,३५,८५०/- |
| ४ | तारकर्ली येथे टॉयलेट ब्लॉक बांधणे | रु. १२,६०,०००/- |
| ५ | तारकर्ली येथे किना-यावर टुरिस्ट सेफ्टी सुविधा देणे | रु. ४८,००,०००/- |
| ६ | मालवण येथील जेट्टीचे मजबुतीकरण करणे | रु. ४७,८०,६०१/- |
| ७ | मालवण येथील जेट्टीवर छप्पर टाकणे | रु. २१,५७,५६५/- |
| | एकूण:- | रु.२,४५,४८,४९९/- |

**जयगड:-**

| | | |
|---|---|---|
| १ | जयगड जेट्टीचे मजबुतीकरण इत्यादी | रु. २९,३६,३८३/- |
| २ | जेट्टीवर स्टीलचे छप्पर टाकणे | रु. १,३८,८२०/- |
| ३ | जेट्टीवर मँगलोरी टाईप छप्पर टाकणे | रु. ६,७७,३४५/- |
| ४ | जयगड निवळी रस्त्याची दुरुस्ती | रु. १,७६,९७,५६६/- |
| ५ | जयगड किल्ल्याजवळ रेस्टॉरंट बांधणे | रु. ३६,००,०००/- |
| ६ | जयगड जेट्टीकडे जाणा-या रस्त्याची सुधारणा | रु. ७,८०,७७५/- |
| | एकूण:- | रु. २,५८,३०,८८९/- |

**विजयदुर्ग :-**

| | | |
|---|---|---|
| १ | विजयदुर्ग किल्ल्याकडे जाणा-या रस्त्याची सुधारणा | रु. १०,४१,०००/- |
| | एकूण: | रु. १०,४१,०००/- |

उपरोक्त कामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे चालू आहे.

१) प्रशासकीय मंजूरीच्या रकमेपेक्षा जास्त खर्च करु नये.

२) तसेच निधी प्राप्त झाल्याशिवाय कोणतेही काम सुरु करु नये.

३) शासनाची मार्गदर्शक तत्त्वे व मापदंडे यांची कटाक्षाने काळजी घ्यावी.

४) जयगड येथे रेस्टॉरंट बांधण्यासंदर्भात शासकीय जमीन / खाजगी जमिन उपलब्ध झाल्याशिवाय त्याबाबत निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

५) On account of Remoteness of Site खाली धरण्यात आलेली १० % वाढ प्रस्तावित क्षेत्रासाठी लागू आहे किंवा नाही हे संबंधित विभागाकडून तपासून घेण्यात येत असून ती देय नसल्यास त्याप्रमाणात निधी कमी करण्यात येईल.

६) प्रस्तावित जेट्टीची कामे इतर विभागाकडून करण्यात येत नसल्याचे प्रमाणित करण्यात यावे.

२. शासन निर्णय क्र. एमटीसी २००३/१२/प्र.क्र. ६०४/ पर्यटन, दि. ९.१.२००४ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हा स्तरीय कमिटीमार्फत कामाचे समन्वय करण्यात यावे.

३. यासाठी होणारा खर्च "३४५२-पर्यटन मागणी क्र. बी-७ -०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२)(१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मूलभूत सुविधाकरिता अनुदान (३४५२ १७७१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यासंदर्भात निधी उपलब्ध झाल्याखेरीज संदर्भाधीन खर्च करण्यात येवू नये.

३. हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. य. नलावडे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, गृह विभाग (परिवहन), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई,
जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग / रत्नागिरी,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग / रत्नागिरी,
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई - ३८,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग / रत्नागिरी,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

प्रत माहितीसाठी सादर.

मा. मंत्री (वित्त ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
मा. मंत्री ( पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.